**आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, उस्मानाबाद संचलित श्रीपतराव भोसले हायस्कूल, उस्मानाबाद या शाळेस कायम विनाअनुदान तत्वावर मंजूर केलेल्या व अनुदानास पात्र घोषित केलेल्या ३७ अतिरिक्त तुकडयांवरील ५६ शिक्षक पदांना अनुदान मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक : न्यायाप्र-२०१८/(१५४/२०१८)/एसएम-४,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ०६ फेब्रुवारी, २०१९.

<u>वाचा</u> :-

(१) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : माशाअ-१००३/(५१६/०३)/ माशि-१, दिनांक १७ फेब्रुवारी, २००४.

(२) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : माशाअ-२००९/(५९९/०९)/ माशि-१, दिनांक २० जुलै, २००९,

(३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : माशाअ-२००९/(५९९/०९)/माशि-१, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११,

(४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक संकीर्ण २०१२/(१५०/१२)/ माशि-१, दिनांक १६जुलै, २०१३,

(५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक माशान्या- १५१४/(७०/२०१४)/ एसएम-४, दिनांक ३० एप्रिल, २०१४,

(६) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक माशान्या-१५१४/(७०/२०१४)/एसएम-४, दिनांक ७ एप्रिल, २०१६.

(७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक माशामु-२०१६/प्र.क्र.१८/एसएम-४, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६.

(८) मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद येथील रिट याचिका क्र.५६३/२०१५ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दि. २५/०४/२०१८ व दि.२७/०८/२०१८ रोजी दिलेला निर्णय.

<u>प्रस्तावना</u> :-

आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, उस्मानाबाद संचलित श्रीपतराव भोसले हायस्कूल, उस्मानाबाद या शाळेतील ३७ अतिरिक्त तुकडया व त्यावरील १८ डी.एड शिक्षक पदे व ३८ पदवीधर शिक्षक पदे अशा एकूण ५६ शिक्षक पदांना संदर्भाधीन क्रमांक ५ येथील दिनांक ३० एप्रिल, २०१४ अन्वये सन २०१२-१३ पासून २० टक्के टप्पा अनुदानास पात्र घोषित करण्यात आले आहे. सदर आदेशाविरूध्द संस्थेने मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक ५६३/२०१५ मधील मा.उच्च न्यायालयाने दिलेले निदेश विचारात घेऊन सदर ३७ तुकडयांना टप्पानिहाय अनुदानास पात्र घोषित करण्याबाबत संदर्भाधीन क्रमांक ६ येथील शासन निर्णय दिनांक ७ एप्रिल, २०१६ अन्वये सुधारित आदेश देण्यात आले.

मंत्रिमंडळाच्या दिनांक १४ जून, २०१६ च्या बैठकीतील निर्णयानुसार, दिनांक १४ जून, २०१६ पूर्वी अनुदानास पात्र घोषित केलेल्या प्राथमिक/ माध्यमिक शाळा तुकडयांना दिनांक १ सप्टेंबर, २०१६ पासून सरसकट २० टक्के अनुदान मंजूर करण्याबाबत संदर्भाधीन क्रमांक ७ येथील दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ अन्वये आदेश दिले आहेत. त्यानुसार सदर ३७ तुकडयांवरील ५६ शिक्षकांना दिनांक १ सप्टेंबर, २०१६ पासून २० टक्के अनुदान अनुज्ञेय होते.

२. सदर ३७ तुकडयांवरील ५६ शिक्षकांना शासन मान्यतेपूर्वीच दिनांक १ जून, २०१२ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०१५ या कालावधीचे वेतन अनुज्ञेय नसताना अदा करण्यात आले आहे. ज्या शाळांना क्षेत्रिय अधिकाऱ्यांच्या स्तरावर यापूर्वीच्या काळात नियमबाहय वेतन अनुदान दिल्याचे लक्षात आल्यास अशा शाळांना अनुदान देण्यात येऊ नये, असे शासन निर्णय दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ मधील परिच्छेद ४.२ मध्ये स्पष्ट केले आहे. त्यामुळे सदर ३७ तुकडयांवरील ५६ शिक्षकांना दिनांक १ सप्टेंबर, २०१६ पासून अनुदान मंजूर करण्यात आलेले नाही. संबंधित संस्थेने याबाबत मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक ५६३/२०१५ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिनांक २५/०४/२०१८ रोजी खालील आदेश पारित केले आहेत.

Time granted. The learned AGP shall also instruct the concerned officials that if there is no legal impediment, the salary shall be disbursed.

मा.उच्च न्यायालयाचे सदर आदेश विचारात घेऊन या ३७ तुकडयांवरील ५६ शिक्षकांना वेतन अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, उस्मानाबाद संचलित श्रीपतराव भोसले हायस्कूल, उस्मानाबाद या शाळेतील ३७ अतिरिक्त तुकडयांवरील १८ डी.एड शिक्षक पदे व ३८ पदवीधर शिक्षक पदे अशा एकूण ५६ शिक्षक पदांना संदर्भाधीन क्रमांक ७ येथील शासन निर्णय दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ मधील आदेशानुसार अनुज्ञेय असलेले २० टक्के अनुदान दिनांक १ डिसेंबर, २०१८ पासून मंजूर करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे. सदर अनुदान खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

(१) शासन निर्णय, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ मधील सर्व अटी व शर्तींची पूर्तता होणे आवश्यक राहील.

(२) मा.उच्च न्यायालयात दाखल असलेल्या रिट याचिका क्रमांक ५६३/२०१५ व सिव्हील ॲप्लिकेशन क्रमांक ११७०९/२०१८ मध्ये मा.उच्च न्यायालयाकडून देण्यात येणाऱ्या पुढील आदेशाच्या तसेच यावरील अतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

(३) संदर्भाधीन क्रमांक ७ येथील शासन निर्णय, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ मधील परिच्छेद ४.२ मधील आदेश शिथील करून सदर शिक्षकांना वेतन अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

(४) सदर शिक्षकांना दिनांक १ सप्टेंबर, २०१६ ते दिनांक ३० नोव्हेंबर, २०१८ या कालावधीची २० टक्केनुसार वेतन अनुदानाची थकबाकी विहित कार्यपध्दतीनुसार अदा करण्यात यावी.

(५) सदर शिक्षकांना दिनांक १ जून, २०१२ ते २८ फेब्रुवारी, २०१५ या कालावधीत नियमानुसार अनुज्ञेय नसताना अदा केलेले वेतन अनुदान समायोजित करावे किंवा कसे याबाबत मा.उच्च न्यायालयाच्या पुढील/ अंतिम निदेशानुसार योग्य ती कार्यवाही करण्यात येईल.

२. संदर्भाधीन क्रमांक ७ येथील शासन निर्णय दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ मधील अन्य आदेश जसेच्या तसे लागू राहतील. सदर आदेशानुसार प्रस्तुत ३७ तुकडयांवरील ५६ शिक्षकांना वेतन अनुदान सुरू करण्याबाबत शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, उस्मानाबाद यांनी पुढील योग्य ती कार्यवाही तात्काळ करावी व त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर ५६ शिक्षकांना दिनांक १ डिसेंबर, २०१८ पासून वेतन अनुदान सुरू करण्याबाबतचे आदेश वित्त विभागाच्या मान्यतेने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १८/२०१९/व्यय-५, दिनांक ०३ जानेवारी, २०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत. तसेच या शिक्षकांना दिनांक १ सप्टेंबर, २०१६ ते दिनांक ३० नोव्हेंबर, २०१८ या कालावधीतील वेतन अनुदानाची थकबाकी अदा करण्याचे आदेश, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका अनुक्रमांक ५ नियम ३९ (ब) टिप-५ अन्वये प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०७१५३५३७७६२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2019.02.07 15:37:54 +05'30'

( स्वाती नानल )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे,
२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे-१,
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
४) महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
५) महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
६) स्थानिक निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
७) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर.
८) शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद,उस्मानाबाद.
९) अधिक्षक, वेतन पथक, जिल्हा परिषद, उस्मानाबाद.
१०) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई-३२.
११) निवडनस्ती एसएम-४.